राज्य कामगार विमा योजना
विमाधारक श्री. सत्यजीत म. मोरे,
विमा क्रमांक ३२१४७३६
वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वैखप्र-२०१५/प्र.क्र.३३/१५/राकावि-२**
जी.टी. हॉस्पिटल संकुल इमारत, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: २५ फेब्रुवारी, २०१५

वाचा :

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्र.राकायो-१०९८/२६७६/प्र. क्र. २९०/ ९८/ राकावि-२, दिनांक ६.०५.२००३.**
२) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग ,क्र.राकायो-१२/प्र.क्र.१९५/१२/राकावि-२, दि.२१.०४.२०१२.**
३) **आयुक्त,राज्य कामगार विमा योजना,मुंबई यांचे पत्र क्र.आयुक्त/राकावियो/ प्रतिपूर्ती/१६/वैप्रअपुणे/मोरे/२३७६-७८/का.क्र.६/१५, दि.०७.०२.२०१५.**
४) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग , क्र .वैखप्र-२०१३ /प्र.क्र.१२२/ १३/ राकावि-२ दि.०४.०४.२०१३.**

प्रस्तावना :

विमाधारक श्री. सत्यजीत म. मोरे, विमा क्रमांक ३२१४७३६ यांनी आई श्रीमती शशिकला यांचेकरीता अश्विनी हॉस्पिटल, कोल्हापूर या खाजगी रुग्णालयात ILEOCEACEL PERFORATION या आजारावर दि.२८/०९/२०११ ते १७/१०/२०११ पर्यंतच्या कालावधीत आंतरुग्ण म्हणून उपचार करण्यात आलेले आहेत. सदर आजारावरील औषधोपचारासाठी एकुण रुपये ८७,८५२.२८/- इतका प्रत्यक्ष खर्च केला असून त्यापैकी अग्राहय देयके वगळून एकुण रूपये ७३,७२२/-(अक्षरी रूपये त्र्याहत्तर हजार सातशे बावीस फक्त) इतक्या रक्कमेच्या वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती मंजूरीबाबतची शिफारस आयुक्त, राकावियो, मुंबई यांनी केलेली आहे.

**शासन निर्णय:**

वर प्रस्तावनेत नमुद केलेल्या विमाधारक श्री. सत्यजीत म. मोरे, विमा क्रमांक ३२१४७३६ यांच्या आईवरील आजारावर केलेल्या औषधोपचारासाठी रुपये ८७,८५२.२८/- इतका प्रत्यक्ष खर्च झाला असून त्यापैकी अग्राहय देयके वगळून एकुण रूपये ७३,७२२/- (अक्षरी रूपये त्र्याहत्तर हजार सातशे बावीस फक्त) इतक्या रकमेच्या वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीस या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०१४ - २०१५ या आर्थिक वर्षात पुढील लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक आर - १,

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
१०२ - राज्य कामगार विमा योजना
१०२ (१)-बृहन्मुंबईतील व मुफसल क्षेत्रातील राज्य कामगार विमा योजना
१०२ -१(बी) - वैद्यकीय प्रशासन अधिकारी, राज्य कामगार विमा योजना
(२२१० १३८५ ) योजनेत्तर

३. हा खर्च राज्य शासन व राज्य कामगार विमा महामंडळ, नवी दिल्ली यांच्यात १ : ७ या प्रमाणात विभागण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र ७५०-अ १२/व्यय-१३,दि.१३.१२.२०१२ अन्वये दिलेल्या निर्देशानुसार तसेच शा.नि.सा.आ.वि., दि.०४/०४/२०१३ नुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव ( आरोग्य ) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०९१४०८४१८३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Giridhar Patil

Digitally signed by Sanjay Giridhar Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Sanjay Giridhar Patil
Date: 2015.02.25 16:40:54 +05'30'

**( सं.गि.पाटील )**
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
२. संचालक (वैद्यकीय), राज्य कामगार विमा योजना, मुंबई.

३. वैद्यकीय प्रशासन अधिकारी, राकावियो , पुणे.
(मुळ बिलाच्या प्रतीसह आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांच्या कार्यालया मार्फत)
४. महालेखापाल - १ ( लेखा परिक्षा )/ (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई.
५. कोषागार कार्यालय , कोल्हापूर.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. वैद्यकीय आयुक्त, राज्य कामगार विमा महामंडळ, कोटला रोड, नवी दिल्ली.
८. प्रादेशीक संचालक, राज्य कामगार विमा महामंडळ, पंचदिप भवन, लोअर परेल, मुंबई - १३.
९. वित्त विभाग ( व्यय -१३ ), मंत्रालय, मुंबई.
१०. **प्रत :-** श्री. सत्यजीत महादेव मोरे, मु.पो. उचगांव, मंगेश्वर गल्ली, मोरे चाळ, ता.करवीर,
११. जि. कोल्हापूर.
१२. अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-१.
१३. निवड नस्ती ( राकावि - २ ).